**नक्षलवादी विरोधी कारवाईत जखमी झालेल्या केंद्र शासनाच्या पोलीस कर्मचा-यांना महाराष्ट्र कुटुंब आरोग्य योजनेमार्फत वैद्यकीय सुविधा उपलब्ध करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

गृह विभाग

**शासन निर्णय क्रमांक:- पीडब्ल्यूएफ ०४११/प्र.क्र.१७८ /पोल-७,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक:- ३ ऑक्टोबर, २०११**

वाचा :- १) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-१२०४/१४३/प्र.क्र.२/पोल-७, दिनांक २ डिसेबर, २००५
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्रमांक-पीडब्ल्यूएफ-१२०४/१४३/प्र.क्र.२/भाग-३/पोल-७, दिनांक २८ जुलै, २००६

**प्रस्तावना :-** महाराष्ट्र राज्यात नक्षलवादी विरोधी कारवाईत एकाच मोहीमेत असताना राज्याच्या पोलीसांप्रमाणे केंद्र शासनाचे पोलीस कर्मचारीही जखमी होतात. राज्याचे पोलीस कर्मचारी जखमी झाल्यास त्यांना महाराष्ट्र कुटुंब आरोग्य योजनेमार्फत वैद्यकीय सुविधा उपलब्ध असल्यामुळे पॅनेलवरील रुग्णालयात तातडीने दाखल करुन वैद्यकीय उपचार केले जातात. तथापि, त्याच मोहिमेवर असतांना जखमी झालेल्या केंद्र शासनाच्या पोलीस अधिकारी/कर्मचा-यांना ही सुविधा लागू नसल्यामुळे त्यांचेवर तातडीने उपचार होत नव्हते. ही बाब विचारात घेऊन एक समान मोहिमेमध्ये जखमी झालेल्या केंद्र शासनाच्या पोलीस अधिकारी/कर्मचा-यांना महाराष्ट्र कुटुंब आरोग्य योजनेमार्फत वैद्यकीय सुविधा उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्यात नक्षलवादी विरोधी कारवाईत राज्याच्या पोलीसांबरोबर एकाच समान मोहिमेत जखमी झालेल्या केंद्र शासनाच्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना पुढील अटींच्या अधीन महाराष्ट्र कुटुंब आरोग्य योजनेमार्फत पॅनेलवरील रुग्णालयात विनामुल्य (कॅशलेस) वैद्यकीय सुविधा उपलब्ध करुन देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

१) केंद्र शासनाच्या जखमी पोलीस अधिकारी/कर्मचारी यांचेकरीता केंद्र शासनाची महाराष्ट्र पोलीस कुटुंब आरोग्य योजनेसारखी योजना अस्तित्वात नसावी.

२) सदर केंद्र शासनाचे पोलीस अधिकारी/कर्मचारी हे नक्षलवादी विरोधी कारवाईत राज्याच्या पोलीसांबरोबर एकाच समान मोहिमेत जखमी झालेले असावेत.

३) केंद्र शासनाच्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांना अथवा त्यांच्या कुटुंबियांना या योजनेचा सर्वसाधारण आजारांकरीता लाभ घेता येणार नाही.

२. सदरचा शासन निर्णय दि.१९.०४.२०११ पासून अंमलात येईल.

३. याबाबतचा खर्च त्या-त्या वर्षी या योजनेकरीता उपलब्ध करुन देण्यात आलेल्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.४८७/११/व्यय-७ दि.२५.०८.२०११ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(दि.शा.घाटगे)
कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

पोलीस महासंचालक, महराष्ट्र राज्य, मुंबई.
सर्व पोलीस उपमहानिरीक्षक
पोलीस उपमहानिरीक्षक, गडचिरोली.
सर्व पोलीस आयुक्त
पोलीस अधिक्षक, गडचिरोली
महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
महालेखापाल-२, महाराष्ट्र (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सह सचिव अर्थसंकल्प,गृह विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
वित्त विभाग (व्यय-७/अर्थसंकल्प-१०),मंत्रालय मुंबई-३२.
बीयुडी-१ कार्यासन, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
निवड नस्ती (पोल-७).